उप संचालक, आरोग्य सेवा,पुणे मंडळ यांच्या अधिपत्याखालील ग्रामीण रुग्णालयातील १४७ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अपदे २०१८/प्र.क्र.१४४/आरोग्य-३ अ**

१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी.रुग्णालय आवार, मुंबई ४०० ००१
तारीख: ११ ऑक्टोबर,२०१९

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्रमांकः सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.अपदे २०१८/प्र.क्र.१४४/आरोग्य-३ अ, दि.१०.०५.२०१९
२) उपसंचालक,आरोग्य सेवा,पुणे मंडळ,पुणे यांचे पत्र उसआसे/अस्थाईपदे/कक्ष-११/२०१९-२० /ग्रारु १४७ पदे /५५०२/ दि.२२/०३/२०१९
३) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क दि.११/०९/२०१९

**शासन निर्णय :-**

उप संचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ यांच्या अधिपत्याखालील ग्रामीण रुग्णालयातील १४७ अस्थायी पदांना संदर्भाधीन क्रमांक १ येथील दि. १०.०५.२०१९ च्या शासन निर्णयान्वये दि.१.०३.२०१९ ते दि.३०.०९.२०१९ या कालावधीकरीता मुदतवाढ देण्यात आली आहे.

२. उप संचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ यांच्या अधिपत्याखालील ग्रामीण रुग्णालयातील १४७ अस्थायी पदांना खालील अटींच्या अधीन राहून दि.१.१०.२०१९ ते दि.२९.०२.२०२० या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

१) उपरोक्त पदांपैकी कोणतेही पद ६ महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त नाही व ज्या कारणांसाठी पदे मंजूर केली आहेत, त्या अटी व शर्तीचे पालन करण्यात आले आहे.
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.११.०९.२०१९ नुसार विहित करण्यात आलेल्या अटी व शर्तीचे कटाक्षाने पालन करण्यात यावे व त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी. त्याचप्रमाणे कार्यालयाचा पदविषयक सुधारित आकृतिबंध उच्चस्तरीय समितीकडून अंतिमत: मान्य करुन घेण्याबाबत तात्काळ कार्यवाही करण्यात यावी.

३) विहीत मुदतीत पदांच्या आढाव्याची कार्यवाही पूर्ण न झाल्यास अस्थायी पदांना त्या पुढील कालावधीसाठी मुदतवाढ न मिळाल्यास व त्यामुळे अधिकारी / कर्मचारी यांच्या वेतन व भत्ताचा प्रश्न निर्माण झाल्यास त्याची जबाबदारी संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांची राहील.

३. सदर पदांवरील होणारा खर्च, " (१) मागणी क्रमांक आर-१, २२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६ सार्वजनिक आरोग्य, ००१ - संचालन व प्रशासन, ००१ (०८) प्राथमिक आरोग्य केंद्राचा ग्रा.रु.इतका दर्जा वाढविणे (२२१० ०४१३), (२) मागणी क्रमांक आर-१, २२१० - वैद्यकिय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०३ - ग्रामीण आरोग्य सेवा व विषम चिकित्सा, ११०- १ इतर रुग्णालय व दवाखाने, (०१) (०१) - कुटीर रुग्णालये (२२१० ०३१५)" या लेखाशिर्षाखालील सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता मंजुर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.११.०९.२०१९ अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१०१०१८०३२४३२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradip M Balkavde

Digitally signed by Pradip M Balkavde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8db6aab31faca2f1a89698a28c94703436c07cda664672d20607766dc59d345b, serialNumber=ed0fa40788bb5c0d7f76b869fa2e5835af215c6a80eae8f70eaf87b0cf68d63f, cn=Pradip M Balkavde
Date: 2019.10.11 16:06:10 +05'30'

**(प्र.मो.बलकवडे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
२) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय ग्रामीण अभियान, मुंबई.
३) संचालक, आरोग्य सेवा-१, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
४) संचालक, आरोग्य सेवा-२, आरोग्य सेवा संचालनालय, पुणे

५) सहसंचालक, रुग्णालय (राज्यस्तर), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई

६) सहसंचालक, आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन), मुंबई

७) उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ, जि. पुणे

८) जिल्हा शल्य चिकीत्सक, जिल्हा रुग्णालय, पुणे/सोलापूर / सातारा.

९) अधिदान व लेखा अधिकारी, पुणे/सोलापूर/सातारा

१०) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/सोलापूर/सातारा

११) वित्त विभाग (व्यय १३)/वित्तीय सुधारणा-१/आपुक/, मंत्रालय, मुंबई

१२) अवर सचिव/कक्ष अधिकारी (सेवा-२, सेवा-३, सेवा-५, अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई

१३) निवडनस्ती(आरोग्य-३अ)